आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करुन राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या महाराष्ट्र राज्यातील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पुरवणी-३५२२/प्र.क्र.१३९/क्रीयुसे -२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दि. ०३ मार्च, २०२३

**वाचा:**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : क्रीडायो २०१२ / प्र.क्र १५८/१२/क्रीयुसे - २; दि.०५.०२.२०१४.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : राक्रीधो २०१८ / प्र.क्र १०३/क्रीयुसे - २; दि.११.१०.२०१८.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : राक्रीधो २०११ / प्र.क्र११५ /क्रीयुसे - २; दि. १५.११.२०२२
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १७२२ / प्र.क्र. १३५ /क्रीयुसे - २; दि. ०२.०३.२०२३

**प्रस्तावना-**

ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धामधील पदक विजेत्या खेळाडूंना व त्यांच्या मार्गदर्शकांना द्यावयाचे पारितोषिकाचे दर शासन निर्णय, दिनांक ५.२.२०१४ व ११.१०.२०१८ अन्यये निश्चित करण्यात आले आहेत. ३६ व्या राष्ट्रीय क्रीडा स्पर्धेच्या ध्वज प्रदान सोहळ्यामध्ये दिनांक २१.९.२०२२ रोजी मा.मुख्यमंत्री महोदयांनी राष्ट्रीय स्पर्धेतील पदक विजेत्या खेळाडूंना सुवर्ण, रौप्य व कास्य पदकासाठी अनुक्रमे रु. ७.०० लाख रु. ५.०० लाख व रु. ३.०० लाख रोख बक्षीस देण्याची घोषणा केली आहे. त्यानुसार दि. १५ नोव्हेंबर २०२२ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय क्रीडा स्पर्धेतील पदक प्राप्त खेळाडू यांना द्यावयाच्या बक्षीसाच्या रकमांचे निर्धारण केले आहे. कैरो इजिप्त येथे संपन्न झालेल्या जागतिक नेमबाजी अजिंक्यपद स्पर्धेतील राज्यातील पदक प्राप्त खेळाडूस मा. मंत्रीमंडळाने रोख पारितोषिक देण्याबाबत ठराव पारित केलेला आहे. त्यानुसार. ०२.०३.२०२३ च्या शासन निर्णयान्वये जागतिक नेमबाजी स्पर्धेमधील पदक विजेत्या खेळाडूंना द्यावयाच्या बक्षीसाच्या रकमांचे निर्धारण केले आहे. त्यानुसार ३६ व्या राष्ट्रीय क्रीडा स्पर्धेतील पदक प्राप्त खेळाडू व मार्गदर्शक, जागतिक नेमबाजी स्पर्धेमधील पदक विजेते खेळाडू व मार्गदर्शक आणि या खेळाडूंच्या बक्षीस समारंभाकरिता निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

सन २०२२-२३ या वर्षाकरिता ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिक देणे यासाठी रु. १०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. तसेच सन २०२२ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रू. २१४७.६० लक्ष रकमेची पुरवणी मागणी मंजूर झालेली आहे. ३६ व्या राष्ट्रीय क्रीडा स्पर्धेतील पदक प्राप्त खेळाडू व मार्गदर्शक, जागतिक नेमबाजी स्पर्धेमधील पदक विजेते खेळाडू व मार्गदर्शक आणि या खेळाडूंच्या बक्षीस समारंभाकरीता मुळ अर्थसंकल्पीय तरतुद आणि पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या रकमेमधून रक्कम रु २४८६.९३ लक्ष ( रुपये चोवीस कोटी शहाऐंशी लक्ष त्र्यान्नव हजार फक्त ) मंजूर करण्यात येत आहे. तसेच सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त बाबीकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक ई-३,२२०४- क्रीडा व युवक सेवा १०४ क्रीडा व खेळ (०९) (०६) ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिक देणे (२२०४ ५३२१)- ५० इतर खर्च" या लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पित तरतूदीमधून भागविण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवू नये.

ii. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत उपसंचालक/जिल्हा क्रीडा अधिकारी/लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २३९/व्यय-५, दि. २३ ०२.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३०३१८४०४५८६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramdas Ganpat Dhumal

Digitally signed by Ramdas Ganpat Dhumal
Date: 2023.03.06 13:14:34 +05'30'

**(रामदास धुमाळ)**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६) मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय
७) अपर मुख्य सचिव नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई .
८) अपर मुख्य सचिव वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-
१०) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१५) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१६) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई-
१७) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (क्रीयुसे-२).